प्रधानमंत्री पीक विमा योजना खरीप हंगाम सन २०१९ साठी राज्य शासनाच्या हिश्याची पिक विमा हप्ता अनुदानापोटी रू.१५०,००,००,०००/- इतकी रक्कम वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०२०/प्र.क्र.१३३/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २६ मार्च, २०२०.

**संदर्भ: -**

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.०१/११- अे, दि.२२.५.२०१९
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९,
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.०१/११- अे, दि.८.५.२०१९.
४. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.१८०/११- अे, दि.१९.७.२०१९
५. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.०१/११- अे, दि.१६.८.२०१९.
६. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.५२/११- अे, दि.१८.०९.२०१९.
७. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.०१/११- अे, दि.२७.११.२०१९.
८. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.१९२/११- अे, दि. १८.२.२०२०
९. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२०/प्र.क्र.१३१/११- अे, दि.२५.२.२०१९.
१०. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि१३.३.२०२०.
११. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृषिआ/सां.८/११३६८/२०२०, दि.१९.३.२०२०.

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप २०१९ मध्ये राज्यात दि.२२.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये भारतीय कृषि विमा कंपनी व बजाज अलियान्स इंशुरन्स कंपनी या २ विमा कंपन्यांमार्फत राबविण्यात येत आहे. कृषि आयुक्त कार्यालयाने संदर्भ पत्र क्र (११) अन्वये प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०१९ अंतर्गत उपरोक्त २ कंपन्यांना पिक विमा हप्ता अनुदानापोटी पुरक मागणीव्दारे उपलब्ध असलेल्या निधीतून राज्य शासन हिश्याच्या रक्कम रू.१५०,००,००,०००/- (रुपये एकशे पन्नास कोटी) इतकी रक्कम वितरीत करण्याची मागणी केलेली आहे. त्यास अनुसरून सदर रक्कम पिक विमा हप्ता अनुदानापोटी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०१९ अंतर्गत कृषि आयुक्तालयाने शिफारस केल्यानुसार पिक विमा हप्ता अनुदानासाठी पुरक मागणीव्दारे उपलब्ध असलेल्या निधीतून राज्य

हिश्याची रू.१५०,००,००,०००/- (रुपये एकशे पन्नास कोटी) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर**
**३३- अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसारच खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्तं (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.७१/२०२०/व्यय-१, दिनांक २४.०३.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. ,

६. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२६१६०६००६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2020.03.26 16:09:16 +05'30'

**( सु. सं. धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
१०. उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
११. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१२. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३
१३. निवड नस्ती (कार्यासन ११-अे).